सन २०२१-२२ च्या मंजूर प्रकल्प आराखड्यातील अंमलजावणीकरीता राज्य रक्त कक्षांतर्गत औषधी व औषधी साहित्य खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत..

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः एनएचएम-१२२२/प्र.क्र.०९/आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २२ मार्च, २०२२.

**वाचा :-**

(१) सहसंचालक (तांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्रमांक : राआसो/ प्रशासकीय मान्यता/राज्य रक्त कक्ष /११५९३२/२०२२, दिनांक : २१.०२.२०२२.

(२) सन २०२१-२०२२ करीता केंद्र शासनाचा मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आराखडा.

(३) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी दिनांक : ११.०२.२०२२ अन्वये मंजूर केलेली टिप्पणी.

(४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग. क्रमांक : खरेदी-२०१६/प्र.क.२४०/आरोग्य-८, दिनांक : २६.०७.२०१७.

**प्रस्तावना:-**

सहसंचालक (तांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी संदर्भाधीन पत्र क्रमांक (१) अन्वये सन २०२१-२२ करीता केंद्र शासनाकडील मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यांमध्ये राज्य रक्त कक्षांतर्गत हिमॅटॉलॉजी, सिकलसेल व रक्त साठवणूक केंद्रांच्या (BSUC) प्रभावी अंमजबजाणी व उद्दिष्ट पूर्ततेसाठी आवश्यक असलेली उपकरणे, साहित्य, किटस् व औषधी खरेदीसाठी अनुदान उपलब्ध झाल्याचे कळविले आहे. तसेच, सदर प्रयोजनार्थ (A) FMR Code "६.१.१.९.१" या अर्थशिर्षांतर्गत रुपये ७०.९० लक्ष, (B) FMR Code "६.२.७.१" या अर्थशिर्षांतर्गत रुपये ९९३.३० लक्ष व (C) FMR Code "६.२.७.२" या अर्थशिर्षांतर्गत रुपये ३२४९.६७ लक्ष (रुपये २००.०० लक्ष + रुपये ३००.०० लक्ष + रुपये २७४९.६७ लक्ष = ३२४९.६७ लक्ष) इतक्या रकमेच्या खरेदीस शासनस्तरावर प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत विनंती केली आहे.

विषयाधीन प्रस्तावास आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी संदर्भाधीन क्रमांक (३) च्या टिपणीन्वये मंजूरी दिली आहे. यास्तव, उक्त FMR Code अर्थशिर्षांतर्गत सन २०२१-२२ करीता केंद्र शासनाकडील मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यांमध्ये राज्य रक्त कक्षांतर्गत हिमॅटॉलॉजी, सिकलसेल व रक्त साठवणूक केंद्रांच्या (BSUC) प्रभावी अंमजबजाणी व उद्दिष्ट पूर्ततेसाठी आवश्यक असलेली उपकरणे, साहित्य, किटस् व औषधी खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ करीता केंद्र शासनाकडील मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यांमध्ये राज्य रक्त कक्षांतर्गत हिमॅटॉलॉजी, सिकलसेल व रक्त साठवणूक केंद्रांच्या (BSUC) प्रभावी अंमजबजाणी व उद्दिष्ट पूर्ततेसाठी आवश्यक असलेली उपकरणे, साहित्य, किटस् व औषधी खरेदी करण्यासाठी FMR Code “६.१.१.९.१” या अर्थशिर्षांतर्गत मंजूर अनुदानातून रुपये ७०.९० लक्ष (रुपये सत्तर लक्ष, नव्वद हजार फक्त) इतक्या रक्कमेच्या साहित्य सामुग्री खरेदीस पुढीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**(A) Equipment for Blood Banks/BSU/BCSU up-gradation of the blood banks for components for Superspeciality hospital Nashik and Gadchiroli..**

| National Health Mission Maharashtra State<br>Approved ROP 2021-22 | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **Sr. No.** | **FMR Code** | **Particulars** | **Quantity** | **Cost per Unit (Inclusive of All Taxes) in Rs.** | **Approved Budget (Rs. In Lakhs)** |
| **Up-gradation of the blood banks** | | | | | |
| 1 | 6.1.1.9.1 | Refrigertated centrifuge | 2 | 18,00,000/- | 36.00 |
| 2 | 6.1.1.9.1 | Luminal Air Flow | 2 | 1,50,000/- | 3.00 |
| 3 | 6.1.1.9.1 | Plasma Expresser | 4 | 30,000/- | 1.20 |
| 4 | 6.1.1.9.1 | 2-8˚C Refrigerator 600 Ltrs | 2 | 4,50,000/- | 9.00 |
| 5 | 6.1.1.9.1 | -40˚C Freezer 600 Ltrs | 2 | 4,10,000/- | 8.20 |
| 6 | 6.1.1.9.1 | Platelet agitator With Incubator | 2 | 1,20,000/- | 2.40 |
| 7 | 6.1.1.9.1 | Thawing Bath | 2 | 1,50,000/- | 3.00 |
| 8 | 6.1.1.9.1 | Incubator | 2 | 50,000/- | 1.00 |
| 9 | 6.1.1.9.1 | 3 parts cell counter | 2 | 3,50,000/- | 7.00 |
| 10 | 6.1.1.9.1 | Weighing Machine/Scale | 2 | 5,000/- | 0.10 |
| | **Total (A)…** | | | | **70.90** |

सन २०२१-२२ च्या मंजूर PIP अनुसार राज्य रक्त कक्षांतर्गत सिकलसेल आजार नियंत्रणाकरीता FMR Code “६.२.७.१” या अर्थशिर्षांतर्गत मंजूर रुपये १९७७.३० लक्ष इतक्या अनुदानातून रुपये ९९३.३० लक्ष इतक्या रक्कमेच्या औषधी खरेदीस पुढीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**(B)**

| National Health Mission Maharashtra State<br>Approved ROP 2021-22 | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **Sr. No.** | **FMR Code** | **Particulars** | **Quantity** | **Cost per Unit (Inclusive GST) in Rs.** | **Approved Budget (Rs. In Lakhs)** |
| 1 | 6.2.7.1 | Cap. Hydroxyurea 500mg | 10,95,000 | 4/- | 43.80 |
| 2 | 6.2.7.1 | Tablet Folic Acid 5mg | 1,09,50,000 | 1/- | 109.50 |
| 3 | 6.2.7.1 | Leucodepletion bed side filters for blood transfusion | 1,20,000 | 700/- | 840.00 |
| | **Total (B)…** | | | | **993.30** |

सन २०२१-२२ च्या मंजूर PIP अनुसार रक्त कक्ष कार्यक्रमांतर्गत हिमोफिलीया व थॅलेसेमिया रुग्णांच्या उपचारासाठी लागणा-या औषधांच्या खरेदीसाठी FMR Code “६.२.७.२” या अर्थशिर्षांतर्गत रुपये ३८५०.०० लक्ष इतके अनुदान प्राप्त झाले आहे. सदर प्रयोजनार्थ प्राप्त झालेल्या अनुदानातून रुपये ३२४९.६७ लक्ष इतक्या रकमेच्या औषधी व औषधी साहित्य खरेदीस पुढीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**(C)**

| **National Health Mission Maharashtra State<br>Approved ROP 2021-22** | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| **THALASSEMIA** | | | | | | |
| **Sr. No.** | **FMR Code** | **Medicine Name** | **Strengnth** | **Total Quantity** | **Proposed approx. Unit Rate Including all Taxes (In Rs.)** | **Total Rs. in Lakhs** |
| 1 | 6.2.7.2 | Tab. Deferasinox | 250mg | 11,92,857 | 5.60 | 66.80 |
| 2 | 6.2.7.2 | Tab. Deferasinox | 500mg | 9,94,047 | 10.08 | 100.20 |
| 3 | 6.2.7.2 | Tab. Deferasinox | 250mg | 1,69,724 | 4.36 | 7.40 |
| 4 | 6.2.7.2 | Tab. Deferasinox | 500mg | 1,45,669 | 7.62 | 11.10 |
| 5 | 6.2.7.2 | Inj. Desferal | 500mg | 3,000 | 1.50 | 4.50 |
| 6 | 6.2.7.2 | FCT Deferasinox | 180mg | 50,000 | 20.00 | 10.00 |
| | **Sub Total (I)..** | | | | | **200.00** |
| **HEMOPHLLIA** | | | | | | |
| 1 | 6.2.7.2 | Factor VII | 1mg | 969 | 41,275.50 | 399.96 |
| 2 | 6.2.7.2 | Factor VIII PD | 250 IU | 19,091 | 1,522.50 | 290.66 |
| 3 | 6.2.7.2 | Factor VIII PD | 500 IU | 10,400 | 2,740.50 | 285.01 |
| 4 | 6.2.7.2 | Factor VIII with VWF | 250 IU | 1,448 | 1,680.00 | 24.33 |
| 5 | 6.2.7.2 | Factor VIII Recombinant | 250 IU | 23,087 | 1,819.13 | 419.98 |
| 6 | 6.2.7.2 | Factor VIII Recombinant | 500 IU | 11,603 | 3,274.46 | 379.93 |
| 7 | 6.2.7.2 | Factor IX PD | 600 IU | 4,826 | 5,594.40 | 269.99 |
| 8 | 6.2.7.2 | Factor IX Recombinant | 500 IU | 1,469 | 12,250.00 | 179.95 |
| 9 | 6.2.7.2 | APCC/FEIBA | 500 IU | 1,747 | 28612.50 | 499.86 |
| | **Sub Total (II)..** | | | | | 2749.67 |
| **Leucodepletion Bags** | | | | | | |
| 1 | 6.2.7.2 | Leucodepletion Bags… | | 44,313 | 677.00 | 300.00 |
| | **Total (III)..** | | | | | **300.00** |
| | **Grand Total (I + II + III) = 200.00 + 2749.67 + 300.00** | | | | | **3249.67** |

उपरोक्त (A), (B) व (C) तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे औषधी व औषधी साहित्य खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

(A) FMR Code “६.१.१.९.१” या अर्थशिर्षांतर्गत रुपये ७०.९० लक्ष (रुपये सत्तर लक्ष नव्वद हजार फक्त),

(B) FMR Code “६.२.७.१” या अर्थशिर्षांतर्गत रुपये ९९३.३० लक्ष (रुपये नऊ कोटी त्र्यांनव लक्ष तीस हजार फक्त)

(C) FMR Code “६.२.७.२” या अर्थशिर्षांतर्गत रुपये ३२४९.६७ लक्ष (रुपये बत्तीस कोटी, एकोणपन्नास लक्ष सदुसष्ट हजार फक्त) {(रुपये २००.०० लक्ष + रुपये ३००.०० लक्ष + रुपये २७४९.६७ लक्ष = ३२४९.६७ लक्ष)}

उक्त (A), (B) व (C) मध्ये दर्शविलेल्या अनुदानास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती :-**

(१) राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान अंतर्गत प्रकल्प अंमलबजावणी आराखडा २०२१-२२ मधील उपलब्ध निधीतून केंद्र शासनाच्या निर्देशानुसार आरोग्यवर्धिनी केंद्रासाठी औषधी व औषधी साहित्य खरेदीची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करुनच, खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

(२) आरोग्यवर्धिनी केंद्रासाठी औषधी व औषधी साहित्य खरेदीसाठी मे. हाफकीन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. परेल, मुंबई यांच्या स्तरावर निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

(३) सदरहू औषधे व औषधे साहित्ये सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्यावत असल्याची खातरजमा केल्यानंतर, खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical Specification) संबंधित तज्ञांनी तांत्रिक समिती/अधिकारी यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावे.

(४) खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical Specification) हे विशिष्ट कंपनीला फायदा होईल, अशा रितीने खरेदी प्रक्रीया राबविण्यात येत नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. तसेच, आरओपी मध्ये मंजूर असलेल्या बाबींचा तांत्रिक विनिर्देशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधित कार्यप्रमुखांची राहील. यथास्थिती, प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

(५) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक : भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

(६) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

(७) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (Specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

(८) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

(९) सदरहू खरेदी प्रक्रियेसाठी होणारा खर्च हा सन २०२१-२२ करीता केंद्र शासनाने दिलेल्या मंजूरीनुसार प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यांमध्ये राज्य रक्त कक्षांतर्गत हिमॅटॉलॉजी, सिकलसेल व रक्त साठवणूक केंद्रांच्या (BSUC) प्रभावी अंमजबजावणी व उद्दिष्ट पूर्ततेसाठी आवश्यक असलेली उपकरणे, साहित्य, किटस् व औषधी खरेदी यासाठी करण्यात यावा.

(१०) तसेच, खरेदी प्रक्रीया राबवितांना खरेदी करण्यात येणा-या बाबींची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

(११) खरेदी प्रक्रीया राबवितांना केंद्र शासनाच्या राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान अंतर्गत प्रकल्प आराखड्यातील मार्गदर्शक सूचनांनुसार तंतोतंत पालन करण्यात यावे.

(१२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र. ४ नियम क्रमांक-७ समोरील स्तंभ क्रमांक-६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

(१३) प्रक्रीया पूर्ण झाल्यानंतर, खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत. तसेच, सदर प्रकरणी शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : खरेदी-२०१६/प्र.क्र. २४०/आरोग्य-८, दिनाक : २६ जुलै, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

०३. उपरोक्त अ.क्र. (१) ते (१३) येथे नमूद केलेल्या अटीं व शर्तीची पूर्तता करण्याची, तसेच विषयाधीन खरेदी ही नियमानुसार व आवश्यकतेनुसार आहे, हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई व सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई यांची राहील.

०४. सदर शासन निर्णय हा, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र. ४, नियम क्रमांक-७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामुग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१६२०१४४०४११७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.03.22 15:13:57 +05'30'

(वि. ल. लहाने)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

(१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
(२) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई.
(३) सहसंचालक (तांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
(४) संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई.
(५) संचालक, आारोग्य सेवा (२), पुणे.
(६) संचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), मुंबई.
(७) संचालक (वित्त) आरोग्य सेवा, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
(८) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा-१/लेखा व अनुज्ञेयता-१), मुंबई.
(९) निवडनस्ती (आरोग्य-७), सार्वजनिक आरोग्य विभाग, नवीन मंत्रालय, मुंबई.